अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अपर संचालक या पदावर पदोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्र. पदोनि-१०२२/प्र.क्र.५२/का.१४२७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५/०५/२०२३.

**शासन आदेश**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहसंचालक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील श्री. सं. ल. पाटील, उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण-नवी मुंबई यांना अपर संचालक या संवर्गातील पदावर खालील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून, या आदेशाच्या दिनांकापासून निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. सदरहू पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नाव | प्रवर्ग | सध्याचे पद | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आलेले पद |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्री. सं. ल. पाटील | खुला | उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण-नवी मुंबई | अपर संचालक, इ. आ. सं. कें., अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई. |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

(१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे व त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास तसे लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

(२) मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून सदर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे.

(३) रिट पीटीशन स्टॅम्प नं. १०८७६/२०२१ व रिट पीटीशन स्टॅम्प नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २५/५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसादर सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

(४) सदर तात्पुरती पदोन्नती प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले ज्येष्ठ अधिकारी रुजू होईपर्यंत किंवा पदोन्नतीच्या आदेशापासून ११ महिन्यांसाठी यांपैकी जे आधी घडेल त्या कालावधीसाठी असेल.

(५) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यार्पन झाल्यानंतर तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांची तात्पुरती पदोन्नती संपुष्टात येईल.

(६) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यार्पन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अपर संचालक संवर्गात रिक्त पदे उपलब्ध नसल्यास अपर संचालक संवर्गातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

(७) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(८) पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्यानंतर श्री. सं. ल. पाटील यांनी ७ दिवसांच्या आत त्यांचे ई-प्रोफाईल सुधारीत करुन त्याची प्रत शासनास तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालयास सादर करावी. प्रत सादर न केल्यास त्यांचे चालू महिन्याचे वेतन अदा केले जाणार नाही.

(९) या पदोन्नतीने श्री. सं. ल. पाटील यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०२३०५२५१३२६०११४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAKASH BABANRAO GHADGE

Digitally signed by PRAKASH BABANRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=2f90259e87b0960801edc01f52214ff1b58c7e3c653fb93bef856fb92941b9d7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77E1EBA3AEC9A0675410DB6FA1A6453877671893222F02B94733DEF91397C59A0, cn=PRAKASH BABANRAO GHADGE
Date: 2023.05.26 15:13:13 +05'30'

**( प्रकाश घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई /नागपूर.
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
७) सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
९) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/१३/१६-ब), मंत्रालय, मुंबई,
१०) सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी/ अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय , प्रादेशिक कार्यालय , कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
१२) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
१३) श्री. सं. ल. पाटील, उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण-नवी मुंबई
१४) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती.